केंद्र शासनाच्या डेव्हलपमेंट ऑफ इनलॅड फिशरीज ॲण्ड ॲक्वाकल्चर योजने अंतर्गत तटीय जिल्हयातील निमखारे पाणी मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा अंतर्गत सुधारित अर्थसहाय्य लागू करणेबाबत..

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र.निखायो-२००९/१३३०४/प्र.क्र.२९/पदुम-१२,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- ५ जानेवारी, २०११.

वाचा:-

१) केंद्र शासनाच्या कृषी मंत्रालयाचे पत्र क्र.३३०३१/१/९०एफवाय(दोन), दि.३१ ऑगस्ट, १९९०.
२) शा.नि,कृषि व पदुम वि. क्र-एफडीएक्स-१०८७/३१४९२/(सीआर४३/८७)/पदुम-१२, दि ७.२.१९९१,
३) शा.नि कृषि व पदुम विभाग क्र.मत्स्यआ २००६/प्र.क्र.८३/पदुम १२, दि.३० मार्च,२००७.
४) केंद्र शासनाचे पत्र क्र.३१०१३/१/०७/एफवाय (३), दिनांक १९ जानेवारी, २००९.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यात सुमारे ७० लहान- मोठया खाडया व ८०,००० हेक्टर खाजण जमीन आहे. मत्स्यव्यवसाय विभागाकडून राज्यातील चार तटीय जिल्हयात 'निमखारे पाणी मत्स्यसंवर्धक विकास यंत्रणा' ही योजना राबविण्यात येते. राज्यातील जास्तीत जास्त खाजण जमीन कोळंबी संवर्धनासाठी उपयोगात आणावी, यादृष्टीने केंद्र शासन व राज्य शासन यांच्यातर्फे संयुक्तरित्या राज्यातील किनारपट्टीवरील ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग या चार जिल्हयात निमखा-या पाण्यावर कोळंबी संवर्धनासाठी प्रत्येक जिल्हयात संदर्भ क्र. २ येथिल शासन निर्णयानुसार निमखारेपाणी मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा स्थापन करण्यात आल्या आहेत. मत्स्यव्यवसाय विभागाच्या सुधारित आकृतीबंधाच्या अनुषंगाने केंद्र शासन पुरस्कृत ही योजना राबविण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

मत्स्यव्यवसाय विभागाच्या १०५० पदांचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेने दिनांक ३० मार्च,२००७ अन्वये निर्गमित केला असून सुधारित पदनाम लागू करण्यात आले आहे. या सुधारित आकृतीबंधानुसार विभागातील सर्व योजनांमधील पदे "मुख्य कार्यालय व प्रादेशिक कार्यालय" व "जिल्हा कायार्लये" या दोन योजनांमध्ये वर्ग करण्यात आली आहेत. त्यामुळे केंद्र शासन पुरस्कृत "मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा" या योजनेखाली स्वतंत्र पदे नाहीत. या योजनेखाली स्वतंत्र पदे नसली तरी ही योजना जिल्हास्तरावर पूर्वीप्रमाणेच राबविली जाते. या योजने अंतर्गत मत्स्यकास्तकारांना केंद्र शासनाने मंजूर केलेल्या अनुदान योजनांचा लाभ देण्यात येतो. केंद्र शासनाचे क्र.१ येथिल संदर्भानुसार डेव्हलपमेंट ॲण्ड इनलँड फिशरीज अँड ॲक्वाकल्चर योजनेंतर्गत मंजूर घटक योजनांपैकी 'निमखारे पाणी मत्स्यसंवर्धक विकास यंत्रणा' ही योजना राबविण्यात येत आहे.

**शासन आदेश**

केंद्र शासनाच्या आर्थिक सहाय्याने राज्यातील किनापट्टीवरील ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग या प्रत्येक जिल्हयात "निमखारे पाणी मत्स्यसंवर्धक विकासयंत्रणा" राबविण्यास आता शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे.

२. ही योजना राबविण्यास दि ७.२.१९९१ च्या शासन निर्णयान्वये प्रत्येक जिल्ह्यात "व्यवस्थापन समिती" स्थापन करण्यात आली होती. आता या समितीमध्ये बदल करुन पुढील प्रमाणे सदस्य राहतील.

**"व्यवस्थापन समिती"**

१) संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी - अध्यक्ष
२) प्रादेशिक उपायुक्त (मत्स्य), मुंबई. - सदस्य
३) कार्यकारी अभियंता, कृषि बांधकाम विभाग - सदस्य
४) संबंधित जिल्ह्याचे अति मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद) - सदस्य
५) मत्स्य संवर्धकांचे दोन प्रतिनिधी - सदस्य
६) सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय(तांत्रिक) - सदस्य सचिव.

३. सदरची केंद्र पुरस्कृत योजना विभागाच्या "जिल्हा कार्यालय" या आस्थापनेखाली राबविण्यात येईल. जिल्हास्तरावर संबंधित जिल्ह्याचे "सहायक आयुक्त (तांत्रिक) मत्स्यव्यवसाय" हे कार्यालय प्रमुख म्हणून असतील.

४. यंत्रणांच्या आस्थापनेवरील वर्ग १ ते वर्ग ४ च्या कर्मचारी वर्गाची स्थापना संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये "जिल्हा कार्यालय" या योजनेमध्ये समायोजीत करण्यात आली आहे.

५. या योजनेखालील मंजूर साहित्य सामुग्री, वाहने, जड वस्तुसंग्रह इ.बाबी संबंधित जिल्ह्याच्या "सहायक आयुक्त (तांत्रिक)" यांच्या कार्यालयाकडे वर्ग करुन वाहनाच्या आर.सी.सी. बुक व साहित्यावर तशी नोंद घेण्यात यावी.

६. यंत्रणांच्या पासबुकावरील बँक व्यवहार यथास्थित चालू राहतील. तथापि पासबुकावरील पदनाम "सहायक आयुक्त (तांत्रिक)" असे राहील.

७. ही मूळ योजना केंद्र शासनाची असून योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र सरकार ७५% व राज्य सरकार २५ % ही खर्चाची पध्दत राहील. यामध्ये केंद्र शासनाकडून करण्यात येणारे बदल लागू राहतील.

८. या योजनेवरील वित्तीय खर्चाचा तपशिल व संख्यामेळ अहवाल स्वतंत्र राहील. याकरिता संबंधित जिल्हा कार्यालयात दोन स्वतंत्र कॅशबुक पध्दती राहील. जिल्ह्याचे वरिष्ठ लिपिक रोख रक्कम हाताळण्याबरोबर दोन्ही कॅशबुक लिखाणाचे काम पहातील.

९. या योजनेंतर्गत कर्मचारी वर्गाचे वेतन वगळता प्रत्यक्ष योजनेवरील होणारा खर्च पुढील प्रमाणे अर्थ शिर्षाखाली नोंदविला जाईल. १) **केंद्र हिस्सा-** २४०५०८३४, २) **राज्य हिस्सा-** २४०५०८०७.

१०. निमखारे पाणी मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा कार्यालयाचे स्वतंत्र अस्तीत्व संपृष्टात येईल व सदर योजना जिल्हयाचे "सहाय्यक आयुक्त (तांत्रिक) यांचेमार्फत राबविली जाईल.

११. या योजनेच्या अर्थसहाय्याबाबतचे "विवरणपत्र - अ" सोबत जोडले आहे त्यानुसार या योजने अंतर्गत लाभार्थ्यांना अनुदान अनुज्ञेय राहील. तसेच एकदा एका लाभार्थ्याची निवड झाल्यावर त्या लाभार्थीचा त्याच योजनेकरिता किमान पुढील पाच वर्षापर्यत पुनश्च विचार करता येणार नाही.

१२. या योजनेचा खर्च केंद्र हिस्सा ७५ % व राज्य हिस्सा २५ % या प्रमाणात खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल. या यंत्रणेच्या कार्यान्वयाची तसेच निधीचे आहरण व संवितरणाचे अधिकार हे संबंधित जिल्हयाचे "सहाय्यक आयुक्त (तांत्रिक)" यांना राहतील.

**१) केंद्र हिस्सा** - २४०५- मत्स्यव्यवसाय, (०२)(०४), निमखारे पाणी मत्स्यसंवर्धन विकास अभिकरण, केंद्र पुरस्कृत योजना, ३१ सहाय्यक अनुदान (२४०५ ०८३४).

**२) राज्य हिस्सा** -. राज्यहिश्याअंतर्गतची तरतूद जिल्हा स्तरावर जिल्हा नियोजन विकास परिषदेमार्फत मंजूर व वितरीत करण्यात येते. या अनुदाना व्यतिरीक्तचा खर्च लाभार्थ्यांनी स्वतः केलेला असेल किंवा वित्तीय संस्थेमार्फत अर्थसहाय्य घेऊन केलेला असेल, तरी या योजने अंतर्गत मंजूर बाबनिहाय अनुदान लाभार्थ्यांना यंत्रणेअंतर्गत व्यवस्थापकीय समितीने प्रमाणित केल्यानंतर देण्यात येईल.

१३. या योजनेच्या भौतिक व आर्थिक साध्य उद्दिष्ठांबाबत त्रैमासिक/वार्षिक प्रगती अहवाल विहीत केलेल्या नमून्यात आयुक्त कार्यालयात सादर करावा.

१४. या यंत्रणेची खाती यंत्रणाने नियुक्त केलेल्या सनदी रोखपालाची नियुक्ती (Chartered Accountant) करावी व त्याच्यामार्फत लेखापरिक्षण करुन त्याचा अहवाल आयुक्त कार्यालयास पाठवावा. आयुक्त (मत्स्यव्यवसाय) यांनी या योजनेचा एकत्रित अहवाल केंद्र शासनाच्या कृषि मंत्रालयास पाठवावा व राज्य शासनास कळवावे.

१५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे व महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत संकेत स्थळावर www.maharashtra .gov.in वर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०१०७ १८०९४४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

**(प. श. अहमद)**
**उप सचिव (मत्स्य)**

प्रति,
आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय,
जिल्हाधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग,
सहाय्यक आयुक्त (मत्स्यव्यवसाय), ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग
महालेखापाल, महा- १/२(लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग,
उप कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग,
अवर सचिव (वित्तीय सुधारणा-१) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मंबई,
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रतिनिधी सागरी उत्पाद निर्यात विकास प्राधिकरण
अवर सचिव, पदुम-१४, कक्ष अधिकारी, पदुम-१३, निवड नस्ती, पदुम-१२

# विवरणपत्र "अ"

केंद्र पुरस्कृत निमखारे पाणी मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा
या योजनेच्या अर्थसहाय्याच्या आकृतिबंधास मंजूरी देणारे
शासन निर्णय क्र.निखायो-२००९/१३३०४/प्र.क्र.२९/पदुम-१२ चे विवरणपत्र

| अ.क्र. | बाब | अर्थसहाय्य |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | निमखारे पाणी कोळंबी प्रकल्पाचे बांधकाम/दुरुस्तीसाठी  अनुदान | २.०० हेक्टर किंवा त्यापेक्षा कमी क्षेत्र असलेल्या लाभार्थींना खर्चाच्या २५% अनुदान रु.६०,०००/- प्रति हेक्टरच्या मर्यादेत. |
| २ | प्रात्यक्षिक व प्रशिक्षण केंद्राची स्थापना | केंद्र शासनाचा हिस्सा रु.५.००लाख फक्त एकदाच. |
| ३ | जलचर प्राण्यातील रोगनिदान प्रयोगशाळांचे जाळे (राज्य शासनाने उभारणी करावयाच्या) | १००% केंद्र पुरस्कृत. |

टिप  :- या योजनेतील अ.क्र.१ व २ साठीचा खर्च ७५% (केंद्र) व २५%(राज्य) अशा स्वरुपात राहील.